**डॉ.डी.वाय.पाटील प्रतिष्ठान,पुणे या प्रायोजक मंडळाच्या स्वयंअर्थसहाय्यीत विद्यापीठाचा प्रस्ताव तपासण्यासाठी छाननी समिती नियुक्त करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## उच्च व तंत्र शिक्षण विभाग
## शासन निर्णय क्रमांकः स्वअवि-२०१७/(७०/१७)/विशि-४

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२.
तारीख: १६ ऑगस्ट, २०१७

**वाचा:**

**शासन निर्णय क्रमांकः स्वअवि-२०१३/(१०६/१३)/विशि-४, दिनांक १० सप्टेंबर,२०१३**

**प्रस्तावना:**

शासनास प्राप्त होणा-या स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठांच्या प्रस्तावांची छाननी करण्यासाठी शासनाने विहित केलेल्या मार्गदर्शक सूचना मधील परिच्छेद ६ (१) नुसार छाननी करण्यासाठी दि. १० सप्टेंबर २०१३ च्या शासन निर्णयान्वये छाननी समिती गठीत करण्यात आली आहे. त्यामध्ये खालीलप्रमाणे बदल करुन डॉ.डी.वाय.पाटील प्रतिष्ठान,पुणे या प्रायोजक मंडळाच्या “डी.वाय.पाटील इंटरनॅशनल युनिर्व्हसिटी, पुणे” या स्वयं अर्थसहाय्यित विद्यापीठाच्या प्रस्तावाची छाननी करण्यासाठी छाननी समिती गठीत करण्याचीबाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार खालीलप्रमाणे छाननी समिती गठीत करण्यात येत आहे.

**शासन निर्णय:**

| अ.क्र. | क्रमांक | सदस्यांचे नाव व पदनाम | समितीतील स्थान |
|---|---|---|---|
| १ | (१) | अप्पर मुख्य सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग | पदसिध्द अध्यक्ष |
| २ | (२) | अप्पर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग | सदस्य |
| | (३) | अप्पर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग | सदस्य |
| | (४) | अप्पर मुख्य सचिव (महसूल), महसूल विभाग | सदस्य |
| ३ | शासनाने नामनिर्देशि केलेला शक्यतो संबंधित विषयाच्या विद्यापीठाच्या कुलगुरु | | |
| | (१) | श्री. देवानंद शिंदे, कुलगुरु,शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर | सदस्य |
| ४ | शासनाने नामनिर्देशित केलेले तीन विख्यात विद्वान,संशोधन किंवा तज्ञ व्यक्ती | | |
| | (१) | श्री. सुब्रतो रथो, निवृत्त सनदी अधिकारी | सदस्य |
| | (२) | श्री. प्रकाश पाठक, वित्त तज्ञ, (CA) | सदस्य |
| | (३) | डॉ.एस.एफ.पाटील, माजी कुलगुरु, उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव | सदस्य |

| अ.क्र. | क्रमांक | सदस्यांचे नाव व पदनाम | समितीतील स्थान |
|---|---|---|---|
| ५ | उच्च व तंत्र शिक्षण विभागातील उप सचिव या दर्जापेक्षा कमी दर्जा नसलेला अधिकारी | | |
| | (१) | सह सचिव /उप सचिव (विद्यापीठ शिक्षण), उच्च व तंत्र शिक्षण विभाग | सदस्य सचिव |
| ६ | प्रकल्पाशी संबंधित विषयातील सखोल ज्ञान व अनुभव असलेली तज्ञ व्यक्ती | | |
| | (१) | डॉ.डी.वाय.पाटील प्रतिष्ठान,पुणे या प्रायोजक मंडळाच्या "डी.वाय.पाटील इंटरनॅशनल युनिर्व्हसिटी, पुणे" प्रस्तावासाठी श्रीमती. अपूर्वा पालकर,यांची निमंत्रित सदस्य म्हणून नामनिर्देशन करण्यात येत आहे. | निमंत्रित सदस्य (मतदानाचा अधिकार असणार नाही) |

## समितीची कार्यकक्षा

१. समितीने शासनास प्राप्त झालेल्या "डी.वाय.पाटील इंटरनॅशनल युनिर्व्हसिटी, पुणे"या प्रस्तावांची तपासणी शासनाने निर्धारित केलेल्या मार्गदर्शक सूचनांननुसार करावी. शासनाने निर्गमित केलेल्या स्वयं अर्थ सहाय्यित मार्गदर्शक सूचनांच्या परिच्छेद ५(२) व ६(३) मध्ये नमूद केलेल्या बाबींच्या अनुषंगाने तपासणी करावी.

२. समितीस मार्गदर्शक तत्वा मधील परिच्छेद ६(४) मधील तरतूदीनुसार प्रायोजक मंडळाकडून अन्य माहिती मागविता येईल.

३. समितीस, सविस्तर प्रकल्प अहवालात उणीवा आढळल्यास त्याबाबत बदल सुचविता येतील आणि प्रायोजक मंडळाने विनिर्दिष्ट कालावधीत त्यावर विचार करुन त्यांचे अनुपालन करण्यासाठी, ते त्या मंडळास कळवता येतील.

४. समितीचा कार्यकाल हा शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांका पासून एक वर्षाचा राहील.

५. समितीतील निमंत्रित सदस्यास मतदानाचा अधिकार असणार नाही.

६. समितीच्या पदसिध्द अध्यक्षांच्या समवेत बैठकीच्या दिनांका पासून दोन महिन्यात आपला अहवाल शासनास सादर करावा.

७. के.पी.एम.जी च्या प्रतिनिधीनी प्रकल्प अहवालाची Summery Sheet तयार करावी.

८. समितीच्या पदसिध्द सदस्यांव्यतिरिक्त इतर सदस्यांना शासनाने विहित केलेल्या प्रचलित नियमांनुसार भत्ता अनुज्ञेय राहील व तो मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८१६११४८३९६५०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Vijay Eknath Sable
Date: 2017.08.16 11:39:28 +05'30'

**(विजय साबळे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री (उ व तं.शि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई :- ४०००३२.
२. मा. राज्यमंत्री (उ व तं.शि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई :- ४०००३२.
३. मा. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई :- ४०००३२.
४. मा. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई :- ४०००३२.
५. मा. अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल विभाग, मंत्रालय, मुंबई :- ४०००३२.
६. मा. अपर मुख्य सचिव (उ व तं.शि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई :- ४०००३२.
७. श्री. देवानंद शिंदे,सदस्य छाननी समिती, कुलगुरु, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर
८. श्री. सुब्रतो रथो, सदस्य छाननी समिती, निवृत्त सनदी अधिकारी, ११०१,हरसिध्दी,खान अब्दुल गफार खान मार्ग, वरळी सी-फेस,वरळी,मुंबई-४०० ०३१.
९. श्री. प्रकाश पाठक, वित्त तज्ञ, (C.A.), सदस्य छाननी समिती,१६ अर्थव, विनायक नगर, वाडीबोकर मार्ग, देवपूर, धुळे - ४२४००२
१०.डॉ. एस.एफ.पाटील, सदस्य छाननी समिती, माजी कुलगुरु, उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव
११.सह सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई:- ४०००३२.
१२.श्रीमती. अपूर्वा पालकर, विषय तज्ञ (डॉ.डी.वाय.पाटील प्रतिष्ठान,पुणे या प्रायोजक मंडळाच्या "डी.वाय.पाटील इंटरनॅशनल युनिर्व्हसिटी, पुणे"प्रस्तावासाठी निमंत्रित सदस्य),
१३.महालेखापाल, (लेखा व परिक्षा-१) / (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
१४.संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१५.कक्ष अधिकारी (रोखशाखा), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई:-४०००३२.
१६.के.पी.एम.जी प्रतिनिधी यांना माहितीस्तव
१७.निवडनस्ती.